**सानुग्रह अनुदान मंजुर करणेबाबत-**
**श्रीमती मनीषा भास्कर डगळे**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- डीपीपी-०२१९/प्र.क्र.७८/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
दिनांक :- ०४ नोव्हेंबर, २०२०.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९.०९.२०१८
२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.डीसीपीएस/२०१/२०१९, दिनांक ३१.०१.२०१९.
३) स्व.भास्कर दामोधर डगळे,लिपिक-टंकलेखक यांचे नामनिर्देशित श्रीमती मनीषा भास्कर डगळे यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दिनांक २८.१०.२०१८ रोजीचा अर्ज.

प्रस्तावना :-

स्व. भास्कर दामोधर डगळे यांची नियुक्ती दि.०२.०६.२००८ रोजी सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, अहमदनगर येथे लिपिक-टंकलेखक पदावर झाली होती.

स्व. भास्कर दामोधर डगळे हे परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचे सदस्य होते. (PRAN ११००५४४३७५४५) त्यांनी आपली पत्नी श्रीमती मनीषा भास्कर डगळे व त्यांचे दोन मुले कु. आदेश भास्कर डगळे आणि कु. सार्थक भास्कर डगळे यांना नामनिर्देशीत केलेले आहे.

शासनसेवेत कार्यरत असताना, स्व. भास्कर दामोधर डगळे यांचा दि.०८.११.२०१५ रोजी मृत्यू झालेला आहे.

संदर्भ क्र.३ च्या अर्जान्वये स्व. भास्कर दामोधर डगळे यांच्या पत्नी श्रीमती मनीषा भास्कर डगळे यांनी रुपये १०,००,०००/- सानुग्रह अनुदान मिळण्यासाठी अर्ज केला आहे.

दि.०१.११.२००५ रोजी व त्यानंतर राज्य शासनाच्या सेवेत नियुक्त झालेल्या व परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या सदस्य असणाऱ्या कर्मचारी दहा वर्षे सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यु पावल्यास, त्यांचे नामनिर्देशीत व्यक्तीस, नामनिर्देशन केले नसल्यास त्याच्या कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान रुपये १० लक्ष अधिक कर्मचाऱ्याच्या खाती जमा असलेली संचीत रक्कम देण्यात यावी. अशी तरतूद वित्त विभाग शासन निर्णय क्र. अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४ दिनांक २९.०९.२०१८ अन्वये करण्यात आली आहे. वरील वस्तुस्थिती पहाता, श्रीमती मनीषा भास्कर डगळे व त्यांची दोन मुले कु. आदेश भास्कर डगळे आणि कु. सार्थक भास्कर डगळे हे सदर शासन निर्णयानुसार एकूण रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) सानुग्रह अनुदानास पात्र ठरत आहेत. यानुषंगाने आता पुढीलप्रमाणे शासन आदेश आहेत.

**आदेश**

उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती मनीषा भास्कर डगळे यांच्या उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने स्व. भास्कर दामोधर डगळे, **लिपिक-टंकलेखक (PRAN ११००५४४३७५४५) यांच्या नामनिर्देशित केलेल्या खालील व्यक्तींना त्यांचे नावासमोर विगतवारी दर्शविल्याप्रमाणे एकूण सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) या आदेशान्वये मंजूर करण्यात येत आहेत.**

| अ. क्र. | नामनिर्देशित व्यक्तीचे नांव | सानुग्रह अनुदान मंजूर करावयाचे प्रमाण | सानुग्रह अनुदानाची रक्कम |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती मनीषा भास्कर डगळे (मृत श्री. भास्कर दामोधर डगळे यांच्या पत्नी) | ४०% | रु.४,००,०००/- |
| २. | कु. आदेश भास्कर डगळे (मृत श्री. भास्कर दामोधर डगळे यांचा मुलगा) | ३०% | रु.३,००,०००/- |
| ३. | कु. सार्थक भास्कर डगळे (मृत श्री. भास्कर दामोधर डगळे यांचा मुलगा) | ३०% | रु.३,००,०००/- |
| | एकूण | | रु.१०,००,०००/- |

२. प्रशासकीय विभागास संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अंनियो-२०१७/ प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च "मागणी क्र. जी-६, २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ, ०१- नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)- परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०४१६१०१०८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.11.04 16:13:58 +05'30'

**(किशोर भालेराव)**
**उप सचिव (विधि), महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

२) संचालक,अभियोग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता कार्यालय, नाशिक

४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक

५) श्रीमती मनीषा भास्कर डगळे, मु.पो.सोंनांबे, ता. सिन्नर, जि. नाशिक.

६) निवड नस्ती